महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्या अंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थान पुरस्कार स्पर्धा सन २०१८-१९ (दहावे वर्ष)

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांक :- सीडीए-२०१९/(प्र.क्र.९७/१९)/लाक्षेवि (कामे)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २६/०२/२०२०

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक : सीडीए-१००५/(४१७/०५)/लाक्षेवि (कामे),दिनांक २१.०८.२००९.
२) शासन निर्णय क्रमांक : सीडीए-२०१६/(प्र.क्र.३३५/१६)/लाक्षेवि (कामे), दि. २२ मे, २०१७
३) शासन निर्णय क्रमांक : सीडीए-२०१६/(प्र.क्र३३५/१६)/लाक्षेवि (कामे), दि. ३० नोव्हेंबर,२०१८.
४) शासन निर्णय क्रमांक : सीडीए-२०१७/(प्र.क्र.२२०/१७)/लाक्षेवि (कामे), दि. १७ फेब्रुवारी, २०२०.
५) शासन निर्णय क्रमांक : सीडीए-२०१८/(प्र.क्र. १५०/१८)/लाक्षेवि (कामे), दि. २५ फेब्रुवारी, २०२०.

**प्रस्तावना :-**

राज्याच्या जलनिती नुसार सिंचन व्यवस्थापनात लाभधारक शेतकऱ्यांचा सहभाग असण्यासाठी सिंचन प्रणालीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन होणे आवश्यक आहे. यास कायद्याचे पाठबळ देण्यासाठी महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन कायदा, २००५ शासनाने पारित केला आहे.

सहभागी सिंचन यशस्वी होण्यासाठी पाणी वापर संस्थांचे व्यवस्थापन कार्यक्रम असणे व पाणी वापर संस्थानी स्वबळावर सुद्दढ (Self-Sustainable) होणे आवश्यक आहे. यास्तव पाणी वापर संस्थांच्या व्यवस्थापनाकरीता महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्याअंतर्गत दरवर्षी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा आयोजित करण्याचा निर्णय संदर्भिय दिनांक २१.८.२००९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ९ मध्ये, " सदर स्पर्धा ५ वर्ष पूर्ण झाल्यावर या पुरस्कार योजनेचा आढावा घेण्यात येईल व आवश्यकतेनुसार योजनेत सुधारणा करण्यात येईल" असे नमूद करण्यात आले आहे. त्यास अनुलक्षून शासन निर्णय दिनांक ११.११.२०११ व दिनांक २६.११.२०१२ अधिक्रमीत करुन आणि शासन निर्णय दि. २१.९.२००९ मध्ये सुधारणा करुन दि. २२ मे, २०१७ रोजी सुधारित शासन निर्णय निर्गमित केला आहे. त्यास अनुलक्षून पुरस्काराचे दहावे वर्षाकरीता (सन २०१८-१९) मोठे प्रकल्प, मध्यम प्रकल्प, लघू प्रकल्प, कोल्हापूर पध्दतीचा बंधारे व साठवण तलाव या पाच गटातील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांक प्राप्त पाणी वापर संस्थांना प्रथम क्रमांकासाठी रु. ५ लक्ष व प्रशस्तीपत्र, द्वितीय क्रमांकासाठी रु. ३ लक्ष व प्रशस्तीपत्र आणि तृतीय क्रमांकासाठी रु. १ लक्ष व प्रशस्तीपत्र देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

महात्मा फुले पाणी वापर संस्था अभियान व त्याअंतर्गत पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पाणी वापर संस्था व्यवस्थापन पुरस्कार स्पर्धा दहावे वर्ष २०१८-१९ करीता राज्यस्तरावरील पुरस्कारासाठी शासनाने पुढील प्रमाणे पाणी वापर संस्थांची निवड केली आहे.

राज्यस्तरीय पुरस्कारासाठी निवड करण्यात आलेल्या पाणी वापर संस्था.

| **गट – मोठे प्रकल्प** | | | |
|---|---|---|---|
| प्रदेश | क्रमांक | पाणी वापर संस्थाचे नाव | प्रकल्प |
| अमरावती | प्रथम | केशवराज पाणी वापर संस्था, अन्वी मिर्झापुर, ता. व जि. अकोला. | काटेपुर्णा मोठा प्रकल्प, ता. बार्शिटाकळी, जि. अकोला. |

| **गट – मध्यम प्रकल्प** | | | |
|---|---|---|---|
| प्रदेश | क्रमांक | पाणी वापर संस्थाचे नाव | प्रकल्प |
| नाशिक | प्रथम | कै. रंगनाथ गोपाळ पाटील पाणी वापर संस्था, वलखेड, ता. दिंडोरी, जि. नाशिक. | वाघाड प्रकल्प, ता. दिंडोरी, जि. नाशिक |

| **गट – लघु प्रकल्प** | | | |
|---|---|---|---|
| प्रदेश | क्रमांक | पाणी वापर संस्थाचे नाव | प्रकल्प |
| नामांकने प्राप्त न झाल्याने माहिती “निरंक” | | | |

| **गट – साठवण तलाव** | | | |
|---|---|---|---|
| प्रदेश | क्रमांक | पाणी वापर संस्थाचे नाव | प्रकल्प |
| नामांकने प्राप्त न झाल्याने माहिती “निरंक” | | | |

| **गट – कोल्हापूर पध्दतीचा बंधारा** | | | |
|---|---|---|---|
| प्रदेश | क्रमांक | पाणी वापर संस्थाचे नाव | प्रकल्प |
| नामांकने प्राप्त न झाल्याने माहिती “निरंक” | | | |

पाणी वापर संस्था व्यवस्थापन स्पर्धेअंतर्गत पाणी वापर संस्थांना प्रत्येक स्तरावर वितरीत करण्यात येणाऱ्या या पुरस्काराच्या रकमेचा विनियोग करण्यासाठी पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना संदर्भिय क्र. १ येथील शासन निर्णयात देण्यात आल्या आहेत.

१) पुरस्कार प्राप्त झालेल्या पाणी वापर संस्थेची विशेष आमसभा बोलावून त्या सभेत विनियोगाबाबत निर्णय घेण्यात यावा.

२) पाणी वापर संस्थेच्या प्रशासकीय व कार्यालयीन नवीन बाबींसाठी पुरस्कार रकमेच्या ५ टक्के पर्यंतच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

३) पाणी वापर संस्थेच्या दृष्टीने सामुहिक उपयोगाची यंत्रसामुग्री उपकरणे (छोटे ट्रक्टर, मळणी यंत्र इ.) खरेदी करण्याबाबत आमसभेच्या सर्वसंमतीने निर्णय घेण्यात यावा. तसेच प्रति घनमीटर पाण्यात जास्तीत जास्त कृषी उत्पादन करणेसाठी उपाययोजना करण्याकरिताही निर्णय घेण्यात यावा.

४) पुरस्काराच्या रकमेतून कोणत्याही परिस्थितीत पाणी वापर संस्थेच्या दैनंदिन स्वरुपाचा खर्च करता येणार नाही.

५) शिल्लक राहणारी पुरस्काराची रक्कम पाणी वापर संस्थेच्या नावे राष्ट्रीयकृत बँकेत मुदत ठेव, राष्ट्रीय बचत प्रमाणपत्र वगैरे मध्ये गुंतवावी. प्राप्त व्याजाच्या रकमेचा विनियोग आमसभेच्या मान्यतेने करता येईल.

वरील मार्गदर्शक सूचना पुरस्कार प्राप्त करण्या-या पाणी वाटप संस्थांच्या निदर्शनास आणण्यात येवून सदर मार्गदर्शन सूचनांची अंमलबजावणी पाणी वापर संस्था करीत आहेत किंवा कसे याची पाहणी संबंधित कार्यकारी अभियंता व विभागीय लेखापाल यांच्यातर्फे करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२६१२२२५०५३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Shamrao Ghatge

Digitally signed by Dinesh Shamrao Ghatge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a5e2f1698bf0950eae5b58e4f323417e5094110c7c24101a0a100ef0a65eb52, serialNumber=944d3f4edf4e98ce36bb02c01a960ec79035a248f041f4852083df7179215b06, cn=Dinesh Shamrao Ghatge
Date: 2020.02.26 12:25:30 +05'30'

**( दि. शा. घाटगे )**
कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व अप्पर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व विभागीय आयुक्त.
८. आयुक्त, कृषी, पुणे.
९. आयुक्त, सहकार, पुणे.
१०.महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११.जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी संचालक.
१२.महासंचालक, जल व भूमि व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
१३.महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी), नाशिक.
१४.सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
१५.जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंता.
१६.अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय,पुणे
१७.जलसंपदा विभागातील सर्व अधिक्षक अभियंता.
१८.जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी अभियंता.
१९.नियोजन विभाग (का क्र. १४३३), मंत्रालय, मुंबई.
२०.वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई.
२१. संपर्क अधिकारी, जलसंपदा विभाग.

२२. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२३. श्री. शहाजी माणिकराव सोमवंशी, संचालक, वाघाड प्रकल्पस्तरीय पाणी वापर संस्था मोहाडी, ता. दिंडोरी, जि. नाशिक.
२४. श्री. सुनील पोटे, मॅनेजिंग डायरेक्टर, युवा मित्र, सिन्नर, जि. नाशिक.
२५. अध्यक्ष, केशवराज पाणी वापर संस्था, अन्वी मिर्झापुर, ता. व जि. अकोला.
२६ अध्यक्ष,. कै. रंगनाथ गोपाळ पाटील पाणी वापर संस्था, वलखेड, ता. दिंडोरी, जि. नाशिक.
२७. लाक्षेवि (कामे), संग्रहार्थ.